कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - अन्नधान्य पिके, गळीत धान्ये व तेलताड अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्यास व PFMS खात्यावरील निधी खर्च करण्यास मान्यता
(केंद्र हिस्सा - २४०१ A ५५७)
(केंद्र हिस्सा - २४०१ A ५६६)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई**-४०० ०३२
**दिनांक : २४ मार्च, २०२२.**

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्या-६, दि.२४.१२.२०२१.
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.असुअ-२०२१/प्र.क्र.९९/४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्ये पिके, गळीतधान्य व तेलताड अभियानासाठी PFMS वरील अखर्चित निधी केंद्र हिस्सा रु.१४५.६१ लाख व राज्य हिस्सा रु.९७.०७३ लाख असा एकूण रु. २४२.६८३ लाख इतका निधी खर्च करण्यास परवानगी मिळण्याबाबत तसेच सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.१३७०.८४ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.७९९.८८ लाख असा एकूण रु.२१७०.७२ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी अन्नधान्ये पिके, गळीतधान्य व तेलताड अभियानासाठी वितरीत PFMS वरील अखर्चित निधी केंद्र हिस्सा रु.१४५.६१ लाख व राज्य हिस्सा रु.९७.०७३ लाख असा एकूण रु. २४२.६८३ लाख इतका अखर्चित निधी खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

तसेच सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून केंद्र हिस्सा रु १३७०.८४. लाख व समरुप राज्य हिस्सा रु ७९९.८८.लाख असा एकूण रु.२१७०.७२ लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **योजनेचे लेखाशिर्ष व केंद्र राज्य / हिस्सा** | **बाब** | **सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद** | **यापूर्वी वितरीत तरतूद** | **सदर शाअन्वये .नि. वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ | ७ |
| कृषी उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - अन्नधान्य पिके, गळीतधान्य व तेलताड अभियान | २४०१A ५५७ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ,३३ अर्थसहाय्य | १६७१.०० | ३००.१६ | १३७०.८४ |
| | २४०१A ५६६ राज्य हिस्सा (४० टक्के) | | १०००.०० | २००.१२ | ७९९.८८ |
| **एकूण** | | | **५०००००.** | **५००.२८** | **२१७०.७२** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.२१७०.७२ लाख (अक्षरी रुपये एकवीस कोटी सत्तर लाख बहात्तर हजार फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२४९/व्यय-१४, दि.१५.०३.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४१२३३३०१५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.24 13:34:32 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.